**थोर राष्ट्रीय पुरुषांच्या साहित्याचे प्रकाशन या योजनेकरिता सन २०२३-२४ या आर्थिक वर्षामध्ये निधी वितरण करणेबाबत. (लेखाशिर्ष २२०५३६२६)**

# महाराष्ट्र शासन

**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक :- बीजीटी-२०२३/प्र.क्र.६१ /अर्थसंकल्प (विघयो)**

मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२

दिनांक :- ३१ मार्च, २०२४

**वाचा :-** १) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.१२.०४.२०२३ व दि.४.३.२०२४

२) उच्च व तंत्र शिक्षण विभागाची नस्ती क्र.संकीर्ण-२०२३४प्र.क्र.६७/मशि-२

३) शासन ज्ञापन समक्रमांक दि.३१.३.२०२४

**शासन निर्णय :-**

थोर राष्ट्रीय पुरुषांच्या साहित्याचे प्रकाशन योजनेअंतर्गत अनुसूचित जाती प्रवर्गासाठी सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात मागणी क्र.एन-३, २२०५-कला व संस्कृती, ००, ७८९, अनुसूचित जातीसाठी विशेष घटक योजना, (०१) अनुसूचित जाती घटक कार्यक्रमांतर्गत योजना, (०१) (०१) थोर राष्ट्रीय पुरुषांच्या साहित्याचे प्रकाशन (कार्यक्रम) लेखाशिर्ष २२०५३६२६ मध्ये विविध उद्दिष्टामध्ये रु.७५०.०० लाख इतका निधी अर्थसंकल्पीत असून सुधारित अंदाजान्वये रु.५३८.०० लाख इतका निधी उपलब्ध करण्यात आला आहे. तसेच संदर्भ क्र.३ नुसार १६-प्रकाशने या उद्दिष्टामध्ये पुनर्वितरण करण्यात आले आहे.

वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.१२.०४.२०२३ व दि.४.३.२०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरिता निधी वितरीणाची कार्यप्रणाली ठरवून दिलेली आहे. त्यानुसार उच्च व तंत्र शिक्षण विभागाच्या संदर्भाधीन क्र.२ येथील प्रस्तावास अनुसरुन वित्त विभागाने दिलेल्या मान्यतेनुसार थोर राष्ट्रीय पुरुषांच्या साहित्याचे प्रकाशन या योजनेतंर्गत (०१) अनुसूचित जाती घटक कार्यक्रमांतर्गत योजना, (०१) (०१) थोर राष्ट्रीय पुरुषांच्या साहित्याचे प्रकाशन (कार्यक्रम) लेखाशिर्ष २२०५३६२६ मधील १६-प्रकाशने या उद्दिष्टामध्ये रु.२३.७५ लाख इतका निधी प्रशासकीय विभाग प्रमुख म्हणून प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर (BEAMS) वितरीत करण्यास मंजूरी प्रदान करण्यात येत आहे.

२. सदर निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात आला आहे. राज्याची आर्थिक स्थिती अतिशय गंभीर स्वरुपाची राहण्याची शक्यता असल्याने सदर वितरीत निधी खर्च करतांना नियंत्रक अधिकारी यांनी विहित पध्दतीने काटकसरीच्या उपाययोजना करुन खर्च करावा. सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखड्यानुसार याच वर्षात निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी. तसेच उपलबध करुन दिलेलया तरतूदीतून झालेलया खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/ उपलेखाशिर्षनिहाय तसेच साध्य झालेले भौतिक उद्दिष्टनिहाय माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र, संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, समाजकल्याण, संबंधित प्रादेशिक उप आयुक्त, सामाजकल्याण, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग व उच्च व तंत्र शिक्षण विभाग यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवणेबाबत दक्षता घ्यावी.

३. विभाग प्रमुख / नियंत्रक अधिकारी यांनी अनुसूचित जाती घटकांसाठीचा निधी त्याच घटकांवर खर्च होईल याची दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनाला या योजनांवर होणाऱ्या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

४. सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला निधी खर्च करतांना विभागप्रमुख तसेच नियंत्रक अधिकाऱ्यांनी महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.१२.०४.२०२३ रोजीच्या शासन निर्णयातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावी.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.१२.०४.२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेलया अधिकारात तसेच वित्त विभाग अनौपचारीक संदर्भ क्र.४४८/२०२४/व्यय-१४, दि.३१.३.२०२४ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलबध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०४०३१६१०४०६६२२ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

PRASHANT PUNDLIK WAGH

Digitally signed by PRASHANT PUNDLIK WAGH
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT, 2.5.4.20=759e87fbd1e68c290a7221620636ede8425d6a870aa0240f18d726b6c8e6b832, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5599270E38B296E5E5D814FF5976561A3EC66D875AEB425D735E1D7C12140929, cn=PRASHANT PUNDLIK WAGH
Date: 2024.04.03 16:20:02 +05'30'

**( प्रशान्त पुं. वाघ )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
२) आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
३) शिक्षण संचालनालय (उच्च शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
४) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५वा मजला, विधानभवन, मुंबई
५) महालेखापाल (लेखापरिक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/ नागपूर
६) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
७) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
८) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
९) उच्च व तंत्र शिक्षण विभाग (आस्था-२), मंत्रालय, मुंबई
१०) निवडनस्ती (अर्थसंकल्प/ विघयो), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग